महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात अनुदान वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०२२/प्र.क्र.६६/का.४

मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ११.०४.२०२२

**वाचा-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.४ एप्रिल, २०२२
२) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे अ.शा.पत्र अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.५ एप्रिल, २०२२
३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र, क्रमांक: २०२२/ म.रा. वक्फ. न्या.औ.बाद/लेखा/१५१/, दि.०६.०४.२०२२.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून अनिवार्य खर्चासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु. १,६९,०८,०००/- (रुपये एक कोटी एकोणसत्तर लाख आठ हजार मात्र ) इतके अनुदान अनिवार्य खर्चासाठी अर्थसंकल्पीत करण्यात आले आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रकान्वये माहे एप्रिल महिन्याच्या बांधिल खर्चासाठी अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये अनुदान वितरणाची मागणी केल्यानुसार संदर्भ क्र.१ व २ येथील शासन परिपत्रक व पत्रान्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास माहे एप्रिल, २०२२ साठी रु. १३,८७,३८०/- (रुपये तेरा लाख सत्याऐंशी हजार तीनशे ऐंशी फक्त) इतके अनुदान खालील दर्शविलेल्या विवरणाप्रमाणे अध्यक्ष, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. तसेच वितरित अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे.

| “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८)” | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | लेखाशिर्ष तपशीलवार | सन २०२२-२३ साठी अर्थसंकल्पीय अंदाज | माहे एप्रिल २०२२ साठी वितरणासाठी उपलब्ध अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान<br>एप्रिल, २०२२ |
| १ | ०१ वेतन | १,२८,३५,०००/- | १२,८३,५०० /- | १२,८३,५००/- |
| २ | ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ८४,०००/- | ५,८८० /- | ५,८८०/- |
| ३ | १०- कंत्राटी सेवा | १४,००,०००/- | ९८,०००/- | ९८,०००/- |
| | **एकूण** | **१,४३,१९,०००/-** | **१३,८७,३८०/-** | **१३,८७,३८०/-** |

उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८) अनिवार्य” या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणाची राहील.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दि.४ एप्रिल, २०२२ तसेच प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे अ.शा.पत्र अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.५ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१११६०५३९९११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.04.11 16:54:16 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
२. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
४. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.